**भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजाच्या विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे या योजनेतील निकषांमध्ये सुधारणा करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : धइंशा-२०२३/प्र.क्र.३३८/योजना-२,**
मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १३ जून, २०२४

**वाचा -** १) शासन निर्णय, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, क्रमांक : धइशाप्र -२०१९/प्र.क्र.७२/शिक्षण दिनांक ४ सप्टेंबर,२०१९

२) शासन परिपत्रक इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र. बैठक-२०२१/प्र.क्र.९४/धसयो, दि. १२/१/२०२२

**प्रस्तावना : -**

भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थी उच्च शिक्षणात मागे पडू नयेत, तसेच उच्च शिक्षणाच्या बदलत्या परिस्थितीशी त्यांना जुळवून घेणे शक्य व्हावे यासाठी भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यांना शहरातील इंग्रजी माध्यमांच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याचा निर्णय संदर्भाधिन दि. ४/९/२०१९ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. ७ (अ) अनिवार्य निकष मधील क्र.(१) शाळाविषयक निकषामधील क्र. (३) मध्ये ‘नामांकित निवासी इंग्रजी माध्यमाच्या शाळेमधून इयत्ता दहावीच्या कमीत कमी तीन बॅच उत्तीर्ण झालेल्या असाव्यात’ असा निकष निश्चित करण्यात आला आहे. तसेच सदरहू योजनेंतर्गत संदर्भाधिन परिपत्रक दि.१२/१/२०२२ अन्वये धनगर समाजातील विद्यार्थ्यांना नामांकित निवासी इंग्रजी माध्यमाच्या शाळेमध्ये इयत्ता १ ली ते ५ वी च्या विद्यार्थ्यांना सर्व टप्प्यावर प्रवेश देण्याची तरतुद करण्यात आली आहे. सदर निकषामध्ये/तरतुदीमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

‘भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे’ या योजनेंतर्गत संदर्भाधिन दि.४/९/२०१९ च्या शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. ७ (अ) अनिवार्य निकष मधील क्र.(१) शाळाविषयक निकषामधील क्र. (३) मध्ये ‘नामांकित निवासी इंग्रजी माध्यमाच्या शाळेमधून इयत्ता दहावीच्या कमीत कमी तीन बॅच उत्तीर्ण झालेल्या असाव्यात’ असा निकष निश्चित करण्यात आला आहे. त्यामध्ये सुधारणा करुन ‘नामांकित निवासी इंग्रजी माध्यमाच्या शाळेमधून इयत्ता दहावीच्या कमीत कमी तीन बॅच उत्तीर्ण झालेल्या असाव्यात अथवा नामांकित निवासी इंग्रजी माध्यमाची शाळा सी.बी.एस.सी मान्यताप्राप्त असावी’ अशी सुधारणा करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

तसेच सदरहू योजनेंतर्गत संदर्भाधिन शासन परिपत्रक दि.१२/१/२०२२ अन्वये भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यांना नामांकित निवासी इंग्रजी माध्यमाच्या शाळेमध्ये इयत्ता १ ली ते ५ वी च्या विद्यार्थ्यांना सर्व टप्प्यावर प्रवेश देण्याची तरतुद करण्यात आली असुन त्यामध्ये सुधारणा करुन इयत्ता १ ली ते ८ वी च्या विद्यार्थ्यांना सर्व टप्प्यावर प्रवेश देण्यास खालील अटींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

(१) 'भटक्या जमाती-क प्रवर्गातील धनगर समाजातील विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देणे' या योजनेंतर्गत विद्यार्थ्यांना प्रवेश देताना प्राधान्याने इयत्ता १ ली ते ५ वी च्या वर्गामध्ये प्रवेश देण्यात यावा.

(२) सदर योजनेंतर्गत इयत्ता १ ली ते ५ वी च्या वर्गामध्ये विद्यार्थी उपलब्ध न झाल्यास इयत्ता ६ वी ते ८ वी च्या वर्गामध्ये प्रवेश देण्यात यावा.

(३) इयत्ता ६ वी ते ८ वी च्या वर्गामध्ये प्रवेश देण्यात येणाऱ्या विद्यार्थ्यांचे प्रमाण हे त्या शाळेला सदर योजनेंतर्गत शासनाने मान्यता दिलेल्या धनगर समाजातील विद्यार्थ्यांच्या एकूण प्रमाणाच्या १५% पेक्षा जास्त नसावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१३१६२७५५३७३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH ROHIDAS CHAVAN

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C2377ED235498603821D49922A210871FF6FB9B369722AC707AEE7DCD87F2BD, cn=DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2024.06.13 16:41:33 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव
६. प्रधान सचिव (इतर मागास बहुजन कल्याण विभाग) यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (शालेय शिक्षण विभाग) यांचे स्वीय सहाय्यक. मंत्रालय, मुंबई
८. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर
९. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. प्रादेशिक उपायुक्त, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग (सर्व)
११. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण (सर्व)
१२. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१३. निवडनस्ती